**महाराष्ट्र राज्य साहित्य आणि संस्कृती मंडळाच्या कार्यालयातील अस्थायी पदांना दि. ०१.०३.२०२५ ते दि. ३१.०८.२०२५ या कालावधीपर्यंत मुदतवाढ देणेबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**मराठी भाषा विभाग**
**शासन निर्णय क्र. साअस्था-२०२२/प्र.क्र.१६/आस्था-२**
नवीन प्रशासन भवन, ८ वा मजला,
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय, मुंबई ४०० ०३२.
दिनांक :- १२ मार्च, २०२५

वाचा :-

१. मराठी भाषा विभाग, शासन निर्णय क्र. आढावा २०१६/प्र.क्र.२३८/आस्था-१, दि. १४.११.२०१९
२. मराठी भाषा विभाग, शासन निर्णय क्र. साअस्था-२०२२/प्र.क्र.१६/आस्था-२, दि. ३०.०९.२०२४
३. सचिव, महाराष्ट्र राज्य साहित्य आणि संस्कृती मंडळ, मुंबई यांचे पत्र क्र. सासंमं २०२५/ आस्था/म. भा.वि./न.क्र.१७९/३२४, दि. २४.०१.२०२५
४. वित्त विभाग, शासन निर्णय क्र. पदनि २०१६/प्र.क्र.८/१६/आ.पु.क., दि. ०३.०३.२०२५

**शासन निर्णय :-**

वाचा येथे नमूद अ.क्र. १ येथील शासन निर्णयान्वये विभागाचा व विभागाच्या अधिनस्त असलेल्या क्षेत्रिय कार्यालयांचा आकृतीबंध निश्चित करण्यात आला आहे. त्यानुसार, विभागाच्या अधिनस्त असलेल्या महाराष्ट्र राज्य साहित्य आणि संस्कृती मंडळ, मुंबई या कार्यालयासाठी एकूण २१ पदे मंजूर करण्यात आली असून, त्यापैकी ४ पदे अस्थायी आहेत. सदर ४ अस्थायी पदांना वाचा येथे नमूद अ.क्र. २ येथील दि.३०.०९.२०२४ रोजीच्या शासन निर्णयान्वये दिनांक ०१.०९.२०२४ ते दि. २८.०२.२०२५ या कालावधीपर्यंत मुदतवाढ देण्यात आली आहे.

२. वाचा येथे नमूद अ.क्र. ३ येथील प्रस्तावाच्या अनुषंगाने महाराष्ट्र राज्य साहित्य आणि संस्कृती मंडळातील खालील तक्त्यात नमूद केलेल्या एकूण ०४ अस्थायी पदांना दिनांक ०१.०३.२०२५ ते दिनांक ३१.०८.२०२५ या कालावधीसाठी मुदतवाढ देण्यात येत आहे.

| अ.क्र. | पदनाम | अस्थायी पदसंख्या | वेतनश्रेणी |
|---|---|---|---|
| १. | सहायक लेखाधिकारी | १ | एस-१५ : ४१८००-१३२३००/- |
| २. | निम्नश्रेणी लघुलेखक (मराठी)/अध्यक्षांचे स्वीय सहायक | १ | एस-१५ : ४१८००-१३२३००/- |
| ३. | लिपिक-टंकलेखक | १ | एस-६ : १९९००-६३२००/- |
| ४. | वाहन चालक (बाह्यस्रोत) | १ | एस-६ : १९९००-६३२००/- |
| | **एकूण अस्थायी पदे** | **४** | |

३. सदर बाबीवर होणारा खर्च "मागणी क्रमांक झेडएफ-०२, लेखाशिर्ष २२०५ कला व संस्कृती, (००) १०२, कला व संस्कृती प्रचालन, (०१) अनिवार्य (०१) राज्य साहित्य व संस्कृती मंडळ (२२०५ ३१७२)-०१ वेतन" या लेखाशिर्षाखाली खर्ची टाकण्यात यावा व तो संबंधित वित्तीय वर्षाच्या मंजूर अनुदानातून भागविण्यात यावा.

४. सदर शासन निर्णय वित्त विभागाच्या संदर्भाधीन दिनांक ०३.०३.२०२५ रोजीच्या शासन निर्णयान्वये प्रशासकीय विभागांना प्रदान करण्यात आलेल्या अधिकारांचा वापर करुन निर्गमित करण्यात येत आहे.

५. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून, त्याचा संकेतांक २०२५०३१२१४४५३८०७३३ असा आहे. हा निर्णय डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

Digitally signed by SHILPA RAJENDRA DESHMUKH
Date: 2025.03.12 14:46:23 +05'30'

**(शिल्पा देशमुख)**
**अवर सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रति,**

१) महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता/लेखापरीक्षा), महाराष्ट्र राज्य, मुंबई.
२) अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई.
३) निवासी लेखा परीक्षा अधिकारी, मुंबई.
४) सचिव, मराठी भाषा विभाग यांचे स्वीय सहायक, मंत्रालय, मुंबई.
५) सहसचिव, मराठी भाषा विभाग यांचे स्वीय सहायक, मंत्रालय, मुंबई,
६) सचिव, महाराष्ट्र राज्य साहित्य आणि संस्कृती मंडळ, मुंबई.
७) कार्यासन व्यय-४/आ.पु.क., वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई.
८) सर्व अवर सचिव/कक्ष अधिकारी, मराठी भाषा विभाग, मंत्रालय, मुंबई.
९) निवडनस्ती, कार्यासन आस्था-२.